**भारतीय शिक्षण संस्था पुणे या संस्थेस सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यासाठी राज्य शासनाकडून देय असलेली ४५ % परिरक्षण अनुदानाची (Matching Grant) रक्कम अदा करण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

## शासन निर्णय क्रमांकः वेतन-२०१४/प्र.क्र.३७८/१४/विशि-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०९ ऑगस्ट, २०१७

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक: वेतन-२०१४/प.क्र. ३७८/१४)/विशि-१, दिनांक ०९ मार्च, २०१७.

२) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे आदेश क्र. उशिसं/वेतन-अनुदान/ भा.शि.सं./ मवि-१/२०१७, ४२५३, दिनांक ३१ मार्च, २०१७

३) संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांचे क्र. उशिसं/भा.शि.सं.-अनुदान/मवि-१/२०१७/७८८०, दिनांक ४ जुलै, २०१७ चे पत्र

**प्रस्तावना** :-

संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये भारतीय शिक्षण संस्था पुणे या संस्थेस सहाव्या वेतन आयोगाच्या फरकापोटी राज्यशासनाकडून देय असलेले रू. ७८.६६ (अठ्ठ्याहत्तर लक्ष सहासष्ट हजार फक्त) एवढे परिरक्षण अनुदान (Matching Grant) "२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण-००४, संशोधन (००) (१) संशोधन संस्थांना सहाय्य (२२०२११७१) मागणी क्र. डब्ल्यू-२, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून मंजूर करण्यात आलेले आहे. तथापि, सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात उपरोक्त लेखाशिर्षात पुरेशी तरतूद उपलब्ध नसल्यामुळे संदर्भीय क्र. २ अन्वये संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी नमूद लेखाशिर्षात उपलब्ध मर्यादेत रू. १८,७६,३८७ /-(अठरा लक्ष शहात्तर हजार तीनशे सत्याऐंशी) एवढी रक्कम सदर संस्थेस अदा केलेली आलेली आहे. त्यामुळे उर्वरित रू. ५९,८९,६१३/- (एकोणसाठ लक्ष एकोन्नवद हजार सहाशे तेरा रुपये फक्त) रक्कम सदर संस्थेस अदा करणे आवश्यक आहे. तथापि, सद्यस्थितीत नमूद लेखाशिर्षाखाली या प्रयोजनासाठी रू. ३५.०० लक्ष रक्कम उपलब्ध असल्याने त्यामर्यादेत अनुदान मंजूर करणे आवश्यक आहे.

## शासन निर्णय

आता या शासन निर्णयान्वये भारतीय शिक्षण संस्थेस सहाव्या वेतन आयोगाच्या फरकापोटी देय असलेल्या रू. ५९,८९,६१३/- (एकोणसाठ लक्ष एकोन्नवद हजार सहाशे तेरा रुपये फक्त) एवढ्या परिरक्षण अनुदानापैकी रू. ३५ लक्ष इतकी रक्कम भारतीय शिक्षण संस्था, पुणे या संस्थेस मंजूर करण्यास शासन मान्यता देत आहे.

सदर रक्कम "२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८० सर्वसाधारण-००४, संशोधन (००) (१) संशोधन संस्थांना सहाय्य (२२०२११७१) मागणी क्र. डब्ल्यू-२, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखालील सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २४०/२०१५/सेवा-९, दि.४.६.२०१५, व क्र. ७४९/व्यय-५ , दि. २४.११.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०९१६३२०१०६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay Eknath Sable
Date: 2017.08.14 11:59:18 +05'30'

**( विजय साबळे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन मलबार हिल, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे विभाग, पुणे.
७) सदस्य सचिव, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सोशल एज्युकेशन, जे.पी, नाईक पथ, १२८/२, कोथरूड, पुणे -४११ ०२९,
८) सदस्य सचिव इंडियन कौन्सिल ऑफ सोशल सायन्स रिसर्च अरुणा असफअली मार्ग, नवी दिल्ली- ११०-०६७,
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई-१ महाराष्ट्र, (५ प्रती),
१०) महालेखापाल (लेखा परीक्षा) मुंबई-१, महाराष्ट्र, (५ प्रती),
११) जिल्हा कोषागार अधिकारी पुणे.
१२) निवड नस्ती (विशि-१).